**अध्यक्ष आणि सदस्य महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण यांच्या वेतनश्रेणी सातव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने सुधारित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मजनिप्रा-२०१७/६२९/प्र.क्र.१४५/जसं (आस्था)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १० डिसेंबर, २०२१

वाचा : १) केंद्र शासन, वित्त मंत्रालय अधिसूचना क्र.सा.का.नि.७२१ (अ) दिनांक २५ जुलै २०१६.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.निवेसू-२०१८/प्र.क्र.१३०/सेवा-४, दिनांक १ जानेवारी २०१९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशींच्या आधारे केंद्र शासनाच्या अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या वेतनश्रेणीत दि.१ जानेवारी २०१६ पासून सुधारणा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या निर्णयाच्या आधारे राज्य शासकीय कर्मचारी / अधिकारी यांना ७ वा वेतन आयोग, शासन अधिसूचना, वित्त विभाग क्र. वेपूर २०१९/प्र.क्र.१/सेवा-९ दिनांक ३० जानेवारी,२०१९ रोजीच्या अधिसूचनेन्वये लागू करण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणातील अध्यक्ष व सदस्य यांना सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांचे वेतन आणि भत्त्यात केंद्र शासनाने सुधारणा केलेली असल्यामुळे महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण या स्वायत्त संस्थेतील अध्यक्ष आणि सदस्य यांच्या विद्यमान वेतनश्रेणीमध्ये सातव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्वायत्त संस्था /पदनाम | ६ व्या वेतनआयोगानुसार देण्यात आलेली वेतनश्रेणी | ७ व्या वेतन आयोगानुसार मागणी करण्यात आलेली सुधारित वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण -अध्यक्ष | रु.८०,०००/-(नियत) | रु.२,२५,०००/- (नियत) |
| २ | महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण- सदस्य | रु.६७०००-७९०००(HAG) | रु.१,८२,२००/- |

२. अखिल भारतीय सेवेतील सेवानिवृत्त अधिकाऱ्यांची नियुक्ती वरील पदावर झाली असल्यास त्यांचेबाबतीत सदर आदेश दिनांक ०१/०१/२०१६ पासून लागू करण्यात यावेत व राज्य सेवेतील सेवानिवृत्त अधिकारी वरील पदावर नियुक्तीधारक असल्यास राज्य शासकीय सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांना निवृत्ती वेतनात सुधारणा होणाऱ्या दिनांकापासून लागू करण्यात यावी.

**३.** अध्यक्ष / सदस्य, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण हे अनुक्रमे भा.प्र.से./ राज्यसेवामधील कार्यरत अधिकारी असल्यास त्यांना सातव्या वेतन आयोगानुसार वेतन मॅट्रीक्सच्या अनुक्रमे स्तर १७ मध्ये (Central Government Notification Dated 25 July, 2016) रु.२,२५,०००/- व स्तर-३१ मध्ये (Government of Maharashtra Notification Dated 30th January, 2019) रु.१,८२,२००/- इतके वेतन अनुज्ञेय राहील आणि ते सेवानिवृत्त अधिकारी असल्यास त्यांचे कायमपद वेतन वजा निवृत्तीवेतन इतक्या रकमेच्या मर्यादेत वेतन अनुज्ञेय राहील.

**४.** हे आदेश वित्त विभाग अनौपचारिक सदर्भ क्र.११९/२०२१/सेवा-४, दिनांक ०८ ऑक्टोबर, २०२१ तसेच अनौ.सं.क्र.१०७७/२०२१/वित्त, दिनांक २५ ऑक्टोबर, २०२१ अन्वये मान्यता प्रदान करण्यात आल्याप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहेत.

**५.** या संबंधातील महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अध्यक्ष व सदस्य यांच्या सेवा शर्तीच्या नियमात स्वतंत्रपणे सुधारणा करण्यात येतील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२१०१५३१०७३०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

JAYA P POTDAR

Digitally signed by JAYA P POTDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a6bf66f95dd09d40d69a5737642a79f0e7da9d3150abc54cc7bad607088c7c18, pseudonym=AC96139E9DBC449B1FA11F60FEB82DD86C649331, serialNumber=45E2D63499928F8B69AB9E8EA3E7CBAB44D2E79B3CF5C253F37180C7E6DE4371, cn=JAYA P POTDAR
Date: 2021.12.10 15:46:46 +05'30'

**( जया पोतदार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,
३. सर्व मा. विधान मंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
४. सर्व मा. मंत्री आणि मा. राज्यमंत्री महोदयांचे स्वीय सहायक,
५. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,
६. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
८. सचिव (लाक्षेवि),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. अध्यक्ष, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
१०. सर्व सदस्य, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
११. सचिव,महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
१२. महालेखापाल(लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
१४. उप सचिव (वित्त) वेपूक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१६. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. आहरण व संवितरण अधिकारी, अधिक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, ८ मोलेदिना रोड, पुणे.
१८. जलसंपत्ती (आस्थापना) कार्यासन संग्रहार्थ.